प्रशासकीय मान्यता :

सन २०२१-२२ या वित्तीय वर्षात राज्य योजनांतर्गत उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून नवनिर्मीत शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, सिंधुदूर्ग येथे प्रथम वर्ष एमबीबीएस विद्यार्थ्यांच्या वसतिगृहासाठी फर्निचर खरेदीस प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग
शासन निर्णय, क्रमांक : जीसीएस-२०२१/प्र.क्र.२८२/प्रशा-१
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन मंत्रालय
९ वा मजला, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई -४०० ००१
दिनांक : ०९ फेब्रुवारी, २०२२

वाचा :
१) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/ आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७
३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२१५/ उद्योग-४, दिनांक २४.०८.२०१७
४) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन,मुंबई यांचे पत्र क्र.संवैशिसं/यंसाख/रा.यो./ शावैम सिंधुदुर्ग/म/९७५८/२०२१, दिनांक १४.०७.२०२१
५) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन,मुंबई यांचे पत्र क्र.संवैशिसं/यंसाख/रा.यो./ शावैम सिंधुदुर्ग/म/२२०७/२०२१, दिनांक ०९.०९.२०२१

शासन निर्णय :-

विभागाच्या नियंत्रणाखालील नवनिर्मित शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, सिंधुदुर्ग या संस्थेस प्रथम वर्ष एमबीबीएस मध्ये प्रवेशित होणा -या विद्यार्थ्यांच्या वसतिगृहाकरीता आवश्यक फर्निचर साहित्य खरेदी करण्यास राज्य योजनेंतर्गत खालील तक्त्यात नमूद केलेले फर्निचर खरेदीसाठी एकूण रुपये ४९,८७,५३०/- (एकोणपन्नास लक्ष सत्याऐंशी हजार पाचशे तीस फक्त) इतक्या रक्कमेस या शासन निर्णयान्वये पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अनु. क्र. | फर्निचरचे नाव | आवश्यक नग संख्या | प्रती नग अंदाजीत किंमत | एकूण रक्कम (जीएसटीसह) |
|---|---|---|---|---|
| मुला मुलींचे वसतिगृहाकरीता फर्निचर | | | | |
| १. | हॉस्टेल बेड स्मॉल, साईज L७२" W३२" H१८" | ३० | ९२६३ | २७७८९० |
| २. | एमएस हॉस्टेल बेड, साईज L७२" W३२" H१८" | २८ | १०३८४ | २९०७५२ |
| ३. | बिग हॉस्टेल बेड, साईज L७२" W३६" H१८" | २६ | ११९५१ | २८९९२६ |
| ४. | एमएस मेटल बेड, साईज L७२" W३०" H२२" | १६ | ८७३२ | १३९७१२ |
| ५. | हॉस्टेल बेड मॅट्रेस | ७० | ३९५३ | २७६७१० |
| ६. | मॅट्रेसेस, साईज ७२"x३०" | ३० | ४२१८.५ | १२६५५५ |
| ७. | कलर बेडशीट | १०० | ९३८.१० | ९३८१० |
| ८. | पिलो | १०० | ४४२.५० | ४४२५० |
| ९. | पिलो कव्हर | १०० | २००.६० | २००६० |
| १०. | स्टुडंट टेबल, साईज L३६" W२४" H३०" | ४३ | ६८४४ | २९४२९२ |
| ११. | स्टडी टेबल, साईज L३६" W२४" H३०" | ४३ | ६९६२ | २९९३६६ |
| १२. | सिंपल रायटींग टेबल, साईज ४x२x२.७५ | १४ | ५७२३ | ८०१२२ |
| १३. | ट्युब्युलार चेअर लेदर | ६७ | ४४२५ | २९६४७५ |
| १४. | ट्युब्युलार चेअर कुशन | ३३ | ३८२३.२ | १२६१६६ |
| १५. | हॉस्टेल रुम कपबर्ड, साईज ६.५x२.७५x१.५ | १४ | २१००४ | २९४०५६ |
| १६. | कपबर्ड लॉकर्स, साईज ६.५x२.७५x१.५ | १५ | १९८२४ | २९७३६० |
| १७. | कपबर्ड, साईज ६.५x२.७५x१.५ | १५ | १९८२४ | २९७३६० |
| १८. | कपबर्ड, साईज ६x२.७५x१.५ | ६ | १७४६४ | १०४७८४ |
| १९. | बुक केस व्हर्टिकल, साईज ६x२.५x१.५ | १४ | २०५३२ | २८७४४८ |
| २०. | बुक केस होरीझोंटल, साईज ६x२.५x१.५ | १४ | २१००४ | २९४०५६ |
| २१. | लायब्ररी बुक केस व्हर्टिकल, साईज ६x२.५x१.५ | ११ | २०६५० | २२७१५० |
| २२. | लायब्ररी बुक केस होरीझोंटल, साईज ६x२.५x१.५ | ११ | २११२२ | २३२३४२ |
| २३. | कोट रॅक | ३७ | ८०२४ | २९६८८८ |
| | (एकूण रक्कम रुपये एकोणपन्नास लक्ष सत्याऐंशी हजार पाचशे तीस फक्त) | | | ४९,८७,५३० |

**अटी :-**

१) सदर प्रशासकीय मान्यता राज्य योजनेंतर्गत संबंधित संस्थेस निधी उपलब्धतेच्या अधिन राहून प्रदान करण्यात येत आहे.

२) सदर विषयी "शासकीय विभागाने करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियमपुस्तिका" याबाबत उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६ व अनुषांगिक शासन निर्णयांमध्ये नमूद केलेल्या विहीत कार्यपध्दतीचे अनुपालन करण्यात यावे.

३) सदर साधनसामुग्री खरेदी विषयक प्रक्रिया "औषधे , तद्अनुषंगीक उपभोग्य वस्तू व वैद्यकीय उपकरणे या बाबींची खरेदी हाफकिन बायो -फार्मास्युटीकल्स कॉपोरेशन लि. मार्फत करण्याबाबत" निर्गमित शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७ नुसार करावी.

४) सदर साधनसामुग्रीची आवश्यकता असल्याचे व त्याची किंमत बाजारभावापेक्षा जास्त नसल्याची खात्री संचालक (वैद्यकीय शिक्षण) यांनी करावी.

५) सदर साधनसामुग्रीसाठी कोणत्याही नवीन बांधकामाची , विद्युतीकरणाची तसेच नवीन पदनिर्मीतीची आवश्यकता नसल्याची खातरजमा करण्यात आलेली आहे.

६) सदर साधनसामुग्रीची विनिर्दिष्टे व्यापक, सर्वसमावेशक असून त्यानुसार साधनपुरवठा करु शकणारे किमान तीन उत्पादक/पुरवठादार यांचेकडून तीन निविदा प्राप्त होऊ शकतील अशा प्रकारची आहेत, असे संचालक (वैद्यकीय शिक्षण) यांनी प्रमाणित करावे.

७) प्रस्तावित साधनसामुग्रीचा समावेश इतरत्र कोणत्याही प्रस्तावात अंतर्भूत केलेला नसल्याबाबत व सदर साधनसामुग्री संबंधित संस्थेस आवश्यक असल्याबाबत संचालकांनी खात्री करावी.

८) मुख्य यंत्र व त्यांचे सुटे भाग (Accessories) यांच्या किंमती भिन्न दर्शविणे आवश्यक राहील.

९) सदर विषयी साधनसामुग्री खरेदीबाबत निर्णय घेताना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या लेखाशिर्षाखाली मंजूर अनुदानाच्या तरतूदीपेक्षा जास्त खर्च केला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

१०) उपरोक्त शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक ०१.१२.२०१६ मधील परिच्छेद क्रमांक ३.१.२ "किंमतीचा अंदाज व किंमतीचा वाजवीपणा" या शीर्षकाखालील परिच्छेद क्रमांक ३.१.२.१ मधील तरतूदीचे राज्यस्तरीय खरेदी समितीने अनुपालन करावे. सदर तरतूदीचे अनुपालन केलेल्या साधनसामुग्रीच्या किंमतीस आवश्यकतेनुसार सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येईल.

११) समान स्वरुपाची व समान विनिर्दिष्टे असलेल्या यंत्रसामुग्री व साधनसामुग्रीची एकच निविदा प्रसिध्द करणेबाबतची कार्यवाही हाफकीन महामंडळाने करावी. अशा प्रकारे निविदा प्रसिद्ध करणे हाफकीन महामंडळास शक्य होईल यानुषंगाने संचालक , वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई यांनी यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदीची मागणी नोंदवावी.

१२) रुपये तीन लक्ष पेक्षा कमी किंमतीची तथापी एकापेक्षा अधिक संस्थांना आवश्यक असणारी यंत्रसामुग्री व साधनसामुग्रीची मागणी एकत्रित करून अशा बाबींची खरेदी हाफकीन महामंडळामार्फत करण्यात येईल.

१३) संस्थास्तरावर खरेदी करण्यात येणा-या यंत्रसामुग्री व साधनसामुग्रीची खरेदी शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक ०१.१२.२०१६ च्या खरेदी धोरणातील कार्यपद्धतीनुसार करतांना याबाबत सदर खरेदी शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक संकीर्ण २०१४/प्र.क्र.२१५/उद्योग-४, दिनांक २४.०८.२०१७ अन्वये विहित करण्यात आलेल्या गव्हर्नमेंट ई मार्केटप्लेस (GeM) पोर्टल कार्यपद्धतीचा वापर करावा.

२. या प्रयोजनासाठी येणारा खर्च संबंधित संस्थेस खालील लेखाशीर्षातंर्गत मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक : एस-०४

| | | |
|---|---|---|
| ४२१० | - | वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य |
| ०३ | - | वैद्यकीय शिक्षण, प्रशिक्षण व संशोधन |
| १०५ | - | विषम चिकित्सा-राज्ययोजनांतर्गत योजना |
| (१०५)(०३) | - | वैद्यकीय महाविद्यालये |
| (००) (३७) | - | शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व रुग्णालये |
| ५२ | - | यंत्रसामुग्री व साधनसामुग्री (योजनांतर्गत) |

(४२१० १६२९)

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/ विनियम, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, उप विभाग -२, अनुक्रमांक-३, नियम क्रमांक-७ अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२०९१५३७५५५४१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Prakash Baban Surwase
Date: 2022.02.09 17:16:58 +05'30'
Adobe Reader version: 11.0.20

( प्रकाश सुरवसे )
उप सचिव , महाराष्ट्र शासन

प्रति,

१. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई

२. महालेखाकार - १ ( लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई
३. व्यवस्थापकीय संचालक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉपोरेशन लि., मुंबई
४. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई
५. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, सिंधुदुर्ग
६. जिल्हा कोषागार अधिकारी, सिंधुदुर्ग
७. निवडनस्ती (प्रशा-१)